**महाराष्ट्र राज्यात 'मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण' योजना- अंमलबजावणी करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांकः- संकीर्ण- २०२४ / प्र. क्र.३१/ई-१ अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ जुलै, २०२४

**वाचा :**
१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.९६/कार्या-२, दि.२८.०६.२०२४, दि.०३.०७.२०२४ व दि.१२.०७.२०२४.
२)महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.१५६/कार्या-२, दि.०५.०७.२०२४.
३)महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.१५१/कार्या-२, दि.०८.०७.२०२४.

**प्रस्तावनाः**

राज्यातील महिलांच्या आर्थिक स्वातंत्र्यासाठी, त्यांच्या आरोग्य आणि पोषणामध्ये सुधारणा करणे आणि कुटुंबातील त्यांची निर्णायक भूमिका मजबूत करणे, यांसाठी महाराष्ट्र राज्यात "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजना सुरु करण्यास उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेचे स्वरुप, लाभार्थी, लाभार्थ्यांची पात्रता, योजनेमध्ये लाभ मिळण्याकरीता आवश्यक असणारी कागदपत्रे, योजनेची कार्यपद्धती इ. बाबी उपरोक्त शासन निर्णयाद्वारे विहित करण्यात आल्या आहेत. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी शासन पुढीलप्रमाणे सूचना निर्गमित करीत आहे.

**शासन परिपत्रकः-**

१. "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजनेचा लाभ मिळण्यासाठी अर्जदारांना राज्याचे अधिवास प्रमाणपत्र/ राज्यातील जन्म दाखला, सक्षम प्राधिकारी यांनी दिलेला कुटुंब प्रमुखांचा उत्पन्नाचा दाखला, रेशनकार्ड, आधारकार्ड इ. कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहेत (वाचा येथील शासन निर्णयाद्वारे याबाबत सूचित करण्यात आले आहे.) सदर योजनेचा लाभ अधिकाधिक महिलांना प्राप्त व्हावा, त्यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे त्यांना तातडीने उपलब्ध व्हावीत यासाठी आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी. विहित कादगपत्रे अर्जदारांना तत्पतरतेने उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यतेनुसार मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात यावे व आवश्यकता असल्यास विशेष शिबीरे आयोजित करण्यात यावीत.

२. "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजनेचे अर्ज पोर्टल/मोबाईल ॲप/ सेतू सुविधा केंद्रे येथून ऑनलाइन भरण्याची तरतूद करण्यात आली आहे. सदर योजनेचा लाभ मिळण्यासाठी आवश्यक असणारी काही कागदपत्रे/ दाखले आपले सरकार पोर्टलद्वारे, महा- ऑनलाइन प्रणालीद्वारे प्रदान करण्यात येतात. सदर योजनेच्या अनुषंगाने लाभार्थ्यांचे मोठ्या प्रमाणावर अर्ज प्राप्त होण्याची शक्यता असल्याने महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाशी समन्वय साधून पोर्टल व डेटा सेंटर सुरळीतपणे सुरु राहील याची कृपया दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनेच्या अनुषंगाने आपले सरकार सेवा केंद्र/महा ई-सेवा केंद्र/सेतू केंद्र/ तहसिल कार्यालये येथून देण्यात येणा-या सेवांवर नियंत्रण व विशेष देखरेख ठेवण्यात यावी. शासनाने ठरवून दिलेल्या वेळापत्रकानुसार आपले सरकार सेवा केंद्र/ ई-सेवा केंद्र सुरु राहून नागरिकांना आवश्यक त्या सेवा पुरवण्यात याव्यात व सदर सेवा पुरविण्यासाठी मनुष्यबळाची कमतरता भासणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर योजनेअंतर्गत अर्ज करण्यासाठी सरकार सेवा केंद्र/ ई-सेवा केंद्र/सेतू केंद्र/ तहसिल कार्यालये इ. येथे उपस्थित राहणा-या महिला अर्जदारांना आणि त्यांच्या प्रतिनिधींना सौजन्याची वागणूक देण्याबाबत आणि त्यांना आवश्यक ती मदत व सहकार्य करण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.

५. "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजनेची प्रभावी अंमलबजावणी व्हावी यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करण्यात याव्यात व त्यासंदर्भात संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०७१८१७४५५१८३१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2024.07.19 11:20:21 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ३२,
२. मा. विधानसभा अध्यक्ष यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
४. मा. नाना पटोले, विधानसभा सदस्य (साकोली विधानसभा)
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
६. प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई - ३२,
७. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. विभागीय आयुक्त (सर्व)
९. विभागीय उपायुक्त (महसूल/सामान्य), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१०. जिल्हाधिकारी (सर्व)
११. निवासी उपजिल्हाधिकारी (सर्व)
१२. उपविभागीय अधिकारी (महसूल)सर्व
१३. निवडनस्ती कार्यासन ई-१अ